# मिस हैटी आणि वानर

मराठी : गार्गी लागू



# मिस हैटी आणि वानर

लेखिका : हेलन



'जिंगल्स' एक लहान वानर होता.
त्याचा मालक खाटा बनवित असे.
काही दिवसापूर्वी ते करड्या रंगाच्या
घरात रहायला आले होते.

करड्या रंगाच घर पांढर्या रंगाच्या घराच्या पुढे होते.
मिस हैटी पांढर्या रंगाच्या घरात रहात होती.
मिस हैती टोप्या बनवित असे. ती अंगरखे पण
शिवत असे. पण जास्त करून टोप्या बनवित असे.



एक वानर करड्या रंगाच्या घरात रहायला आला
आहे हे मिस हैटीला अजिबात आवडले नाही.
तिला वानर आवडत नसत.



करड्या रंगाच्या घराच्या समोर, रस्त्याच्या दुसर्या बाजूला एक पिवळ्या रंगाचे घर होते. डिक, जीन आणि छोटा बिली, आपल्या आईवडिलां बरोबर त्या घरात रहात होते. डिक, जीन आणि बिलला वानर आवडत असत.

जिंगल्सला पण डिन जीन
आणि बिल आवडत होते.
“हे बघा,” डिक म्हणाला
'जिंगल्सची टोपी जुनी झाली आहे.'
“त्याचा अंगरखा पण खूप पातळ आहे,” जीन म्हणाली.
“खंडणीसाठी जिंगल्सला नवीन अंगरखा हवा.”






मुलांनी आपल्या आईला जिंगल्स बद्दल सांगितले. "आता थंडीचे दिवस येतील"...आई म्हणाली. " जिंगल्सला उबदार अंथरूण, पांघरूण लागेल"..डिक म्हणाला, "खाट बनविणार्याने त्याच्यासाठी उबदार अंथरूण बनवून दिले आहे.

त्याला प्रत्येक दिवशी पोटभर खायला मिळाला हव' आई म्हणाली
“खाट तयार करणारा त्याचा मालक त्याला खायला देतो,” जीनने सांगितलं



"कधी कधी आम्ही त्याला खाऊ पण नेऊन देतो," डिक म्हणाला. पण जिंगल्ससाठी गरम, उबदार अंगरख्याची जरूर आहे. खाटा बनविणारा अंगरखा शिवू शकत नाही. आम्ही पण नाही शिवू शकत...... मग जिंगल्ससाठी अंगरखा कोण शिवेल?





डिकने दरवाजाची घंटा वाजविली.
घंटा वाजवित असतांना एक बटण
त्याच्या हातातून खाली पडले.
मिस हैटीने खिडकीतून बाहेर बघितले.
तिने जिंगल्सला बटन उचलतांना
पाहिले.
"ते बटन मला दे बरं...." डिक म्हणाला.
जिंगल्सने त्याला बटन दिले.
"धन्यवाद"! डिक म्हणाला.

"मिस हैटीला विचारून बघा...." आई
म्हणाली." अगरखा शिवायला कापड मी
देईन...." मुल मिस हैटीला भेटायला गेली.
जिनने लाल रंगाचे कापड बरोबर घेतले
आणि डिकने ४ बटणे बरोबर घेतली. बिल
आणि जिंगल्सपण बरोबर गेले.



"मी तुम्हाला घरात बोलावू शकत नाही याबद्दल मला फार वाईट वाटत आहे." मिस हैटी म्हणाली. "मी बाहेर जात आहे"

जीनने मिस हैटीला लाल रंगाचे कापड दिले. डिकने बटने दिली. आणि विचारले," जिंगल्ससाठी एक छानसा अंगरखा शिवून द्याल का?"

"मला नाही म्हणायला खूप वाईट वाटत आहे, पण वानरांसाठी मी कपडे शिवत नाही," मिस हैटी म्हणाली.



मिस हैटीने दरवाजा उघडला. मुलांकडे बघून ती हसली. पण जिंगल्सकडे बघितल्यावर तिचे हसू मावळले. तिने एक टोपी घातली होती आणि घेरदार परकर घातला होता.





"पण जिंगल्सचा अंगरखा खूपच पातळ आहे," जीन म्हणाला.

"नाही जमणार.....मला खूप काम आहेत....मला क्षमा करा...," मिस हैटी म्हणाली. "मी महापौराच्या बायकोसाठी २ टोप्या बनविल्या आहेत. ती आज प्रवासाला निघणार आहे. आत्ताच तिला टोप्या द्यायला मी निघाले आहे. मुलांनो, तुम्ही घरी जा."

मिस हैटीच्या चेहर्यावरची नापसंती बघून मुलं त्याक्षणी निघून घरी आली. जिंगल्सच्या अंगरख्याचे कापड व बटने तिथेच विसरून आली. मिस हैटीने एका डब्यात दोनही टोप्या ठेवल्या आणि झटपट दाराच्या बाहेर येऊन जिना उतरू लागली.

अरे......ती पुढे जाऊच शकत नव्हती.



मिस हैटीचा घोळदार परकर दरवाजात अडकला होता. आणि दरवाजा बंद झाला होता. मिस हैटीने दरवाजा २-३ वेळा ओढून बघितला. पण व्यर्थ.....अडकलेला परकर .....दरवाजा उघडेना.

बाहेर सज्ज्यामधे एका कुंडीखाली किल्ली ठेवली होती पण मिस हैटीचा हात तिथपर्यंत पोहोचत नव्हता.



तिने हातातील छत्रीने कुंडीला धक्का दिला. कुंडी तर पडली पण तिच्याबरोबर किल्ली पण पडली. मिस हैटी किल्लीपर्यंत पोहोचू शकत नव्हती.

मिस हैटीला प्रश्न की आता काय करावं?
माझी बस चुकेल, महापौरांच्या पत्नीला टोपी
शिवाय प्रवासाला जावे लागेल......काय करू?

मिस हैटी कुणीतरी येण्याची वाट
पाहू लागली.
दूधवाला......
पेपरवाला.....
पोस्टमन....
पण कुणीच आले नाही.





मिस हैतीला आवाज ऐकू आला....तो जिंगल्स
होता. तो हैतीच्या सज्ज्यात परत आला होता. मिस
हैटी त्याला चिडून म्हणनार होती, चल, परत जा."
.......पण ही वेळ त्याच्यावर रागावण्याची नव्हती.





जिंगल्सला किल्ली दिसली. त्याने किल्ली उचलली, तिचे निरिक्षण केले. जमिनीवर आपटून पाहिली. केस विंचरून पहायचा प्रयत्न केला. तर विचित्रच आवाज आला.

मिस हैटीने जिंगल्सकडे पाहिले. तिला एक कल्पना सुचली. तिने जिंगल्सला विनवणी केली, "मला देतोस का किल्ली?" तिने हात पुढे केला. जिंगल्सने हैटीकडे पाहिले व किल्लीकडे पाहिले.



"जिंगल्स, मला कृपा करून किल्ली दे," हैटी म्हणाली. जिंगल्स जवळ गेला आणि त्याने मिस हैटीच्या हातात कील्ली दिली. "धन्यवाद!" हैटी जिंगल्सला म्हणाली. जिंगल्स घरी परत आला.




मिस हैटीने किल्लीने दरवाजा उघडला आणि अडकलेला परकर सोडवून दरवाजा परत बंद केला. आणि बस पकडायला झटपट निघाली.

त्याच दिवशी दुपारी मिस हैटीने मुलांना बोलाविले. "मला तुम्हाला काही दाखवायचे आहे" ती म्हणाली. तिथे जिंगल्स होता. .....जिंगल्सने लाल रंगाचा अंगरखा आणि लाल रंगाची टोपी घातली होती.



"वा वा, मिस हैटी, तुम्ही जिंगल्ससाठी नविन पोशाख बनविला!" मुले म्हणाली.
"हो" ...मिस हैटी म्हणाली."  जिंगल्स आणि मी आता चांगले मित्र आहोत."...हैटी जिंगल्सकडे बघत हसून म्हटले. जिंगल्सने मिस हैटीचा हात हातात घेतला. त्यांनी एकमेकांकडे मित्रत्वाच्या नात्याने पाहिले.
त्यांच्या मैत्रीचे रहस्य त्यांनाच माहित होते. .......



**समाप्त**